**<u>निलंबन कालावधी नियमित करण्याचे</u>**
**अधिकार प्रत्यायोजित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्ररजा-२०१५/ प्र.क्र.२५/ सेवा-६**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
तारीख: २५.०४.२०१७

**<u>वाचा :</u>**

१) शासन निर्णय क्रमांक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे १००१/१३०/सेवा-४, दिनांक २.०६.२००३

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही २००५/ प्र.क्र. ५/५/१२, दिनांक २६.६.२००६

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही २०१५/प्र.क्र.८५/१२, दिनांक १६.०२.२०१५.

**<u>प्रस्तावना :</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने ) नियम १९८१ मधील नियम ७२ नुसार निलबंनाच्या कालावधीसाठी दयावयाचे वेतन व भत्ते व सदर अनुपस्थितीचा कालावधी नियमित करण्याचे पूर्ण अधिकार हे, वेतन व भत्याचे प्रदान व सदर अनुपस्थितीचा कालावधी नियमित करण्याचे आदेश काढण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांस शासन निर्णय, वित्त विभाग, दि.०२ जून २००३ च्या परिशिष्ट एक मधील अनु. क्र. ८ अन्वये प्रत्यायोजित केले आहेत.

प्रशासनात गतीमानता येण्यासाठी निलंबन कालावधी नियमित करण्याबाबतचे अधिकार प्रत्यायोजित करणे आवश्यक आहे. त्यानुसार निलंबन असमर्थनीय असलेल्या व निलंबन असमर्थनीय नसलेल्या अशा दोन्ही प्रकरणात निलंबन कालावधी नियमित करण्याबाबतचे अधिकार प्रत्यायोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने ) नियम १९८१ मधील नियम ७२ प्रमाणे निलबंनाच्या कालावधीसाठी दयावयाचे वेतन व भत्ते व सदर अनुपस्थितीचा कालावधी हा कामावर व्यतीत केलेला कालावधी मानण्यात यावा किंवा कसे हे नियमित करण्याबाबत प्रचलित कार्यपध्दतीनुसार जी प्रकरणे मा. मुख्यमंत्री महोदयांकडे मान्यतेसाठी सादर करण्यात येतात अशा प्रकरणापैकी निलंबन समर्थनीय असलेल्या प्रकरणी निलंबन कालावधी नियमित करण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागाचे मंत्री तसेच मा. मुख्यमंत्री यांच्याकडे असलेल्या विभागांबाबत त्या विभागाचे राज्यमंत्री यांना प्रत्यायोजित करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने ) नियम १९८१ मधील नियम ७२ प्रमाणे निलबंनाच्या कालावधीसाठी दयावयाचे वेतन व भत्ते व सदर अनुपस्थितीचा कालावधी हा कामावर व्यतीत केलेला कालावधी मानण्यात यावा किंवा कसे हे नियमित करण्याबाबत प्रचलित कार्यपध्दतीनुसार जी प्रकरणे मा. मुख्यमंत्री /मा. मंत्रीमहोदयांकडे मान्यतेसाठी सादर करण्यात येतात, अशा प्रकरणी पुढील नमुद बाबींचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागाचे सचिव यांना प्रत्यायोजित करण्यात येत आहे :-

१) निलंबनाधीन शासकीय कर्मचाऱ्यांविरुध्द सुरु करण्यात आलेली शिस्तभंगाची किंवा न्यायालयीन कारवाई समाप्त होण्यापूर्वी त्या कर्मचाऱ्याचे निधन झाल्यास

२) निलंबन असमर्थनीय असल्यास

३) निलंबन असमर्थनीय आहे मात्र कर्मचाऱ्याविरुध्द चालू असलेली कारवाई समाप्त होण्यास ज्या कारणामुळे विलंब लागला आहे त्याचा संबंध प्रत्यक्षपणे शासकीय कर्मचाऱ्याशी जोडता येण्यासारखा आहे असे प्रशासकीय विभागाच्या सचिवांचे मत असल्यास

३. उपरोल्लेखित प्रकरणे सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागास सादर करण्यात येऊ नयेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२५१५४४३२५७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhalchandra Jagannath Gadekar

Digitally signed by Bhalchandra Jagannath Gadekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d2671e08dbf49e6a42b865d026c3f07bc1eb8254056eab8fa6b4b0fb72dd47ba, cn=Bhalchandra Jagannath Gadekar
Date: 2017.04.26 11:07:16 +05'30'

**( भा. ज. गाडेकर )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन , मुंबई
४. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
५. मुख्य सचिवांचे उप सचिव
६. मंत्रालयीन सर्व विभाग
७. मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई

१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
११. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१३. आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
१४. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
१५. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१८. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२०. सर्व विभागीय आयुक्त
२१. सर्व जिल्हाधिकारी
२२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
२३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२६. जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब,
२७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२८. सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
२९. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
३०. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.,बॅरेंक क्रमांक-१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईट, मुंबई-२०
३१. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी,३१४,राजभुवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई-४
३२. भारतीय कम्युनिस्ट पार्टी,(मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
३३. इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय)समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
३४. नॅशनलिस्ट कॉग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईट, मुंबई-२१
३५. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८
३६. निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-६)